**पद्मविभुषण शिवशाहीर बाबासाहेब पुरंदरे यांनी निर्देशित केलेल्या "जाणता राजा"या कार्यक्रमाच्या आयोजनासाठी प्रायोजकत्व स्वीकारण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण ०३२३/प्र.क्र.२७/ता.क.१**
१५ वा मजला, नवीन प्रशासकीय इमारत, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:- २८ मार्च, २०२३

**<u>संदर्भ:</u>** मा. श्री. आशिष शेलार, वि.स.स. यांचे दि.२० फेब्रुवारी, २०२३ चे पत्र.

**प्रस्तावना:-**

पद्मविभुषण शिवशाहीर बाबासाहेब पुरंदरे यांनी लिखित व दिग्दर्शित केलेल्या "जाणता राजा" या कार्यक्रमाच्या आयोजन दिनांक १४ मार्च, २०२३ ते दिनांक १९ मार्च,२०२३ दरम्यान शिवाजी पार्क,दादर येथे आयोजित करण्यात येणार आहे.

**शासन निर्णय:-**

सदर कार्यक्रमाच्या यशस्वी आयोजनासाठी शासनस्तरावरुन जास्तीत जास्त संभाव्य प्रायोजकत्वासाठी या कार्यक्रमाचा विचार करुन आणि उदात्त कारणासाठी सहकार्य करण्याबाबत .
मा. श्री. आशिष शेलार, विधान सभा सदस्य यांनी विनंती केली आहे.

२. आशियातील (जाणता राजा) हे सर्वात मोठे नाटक छत्रपती शिवाजी महाराजांच्या जीवन चरित्राचे चित्रण करते. हया नाटकात २५०हून अधिक कलाकार स्टेजवर ५मजली सेटसह कला सादर करणार आहेत. तसेच दररोज १०,००० पेक्षा जास्त प्रेक्षक सदर आयोजित कार्यक्रमाचा लाभ घेणार आहेत. सदर कार्यक्रमाचे प्रयोजकत्व महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळाने स्वीकारण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती. छत्रपती शिवाजी महाराजांच्या जीवन चरित्राचे महत्व लक्षात घेता उपरोक्त कार्यक्रमाचे प्रायोजकत्व महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळाने स्विकारण्याबाबत शासनाने निर्णय घेतला आहे.

३. प्रस्तूत शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२२/प्रक्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतंस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०२३०३२९१७३१४०८६०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल याचे नावाने व आदेशानुसार,

SANJAY B SANDANSHIV

Digitally signed by SANJAY B SANDANSHIV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8513f344f5f53191f0ef6743ed7a41d7dde86a2258b1ee9e619be512fc3574d7, pseudonym=13C68E8F8AC241A19214DACFA64F635B69CFF527, serialNumber=71C40B92134CD76984CC9D8CC8E950182C08F2B043AC76F116AA0EC8E90C28B9, cn=SANJAY B SANDANSHIV
Date: 2023.03.29 17:38:10 +05'30'

**(संजय संदानशिव)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

३) मा.पालकमंत्री, मुंबई शहर .
४) मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
५) मा. प्रधान सचिव, (पर्यावरण व वातावरणीय बदल) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
६) सदस्य सचिव,महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ,सायन, मुंबई-२२.
७) संचालक (पर्यावरण), पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८) जिल्हाधिकारी, मुंबई शहर.
९) मा. श्री. आशिष शेलार, वि.स.स
१०) निवडनस्ती.